राज्यातील औरंगाबाद-पुणे-नागपूर येथील
विमानतळाच्या सुरक्षेसाठी निर्माण केलेली
८३ पदे पोलीस आयुक्तालय औरंगाबाद, पुणे
व नागपूर यांचे आस्थापनेवर वर्ग करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र.एपीओ ३१०२/प्रक्र.१८/पोल-३
मंत्रालय मुंबई-४०० ०३२, दि. ७ मार्च २००३.

वाचा:-(१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य ,मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६/ ४७/औरं-एमआयडीसी-सिडको/पूर्ण हिंजवडी/नागपूर-गिट्टीखदान/२००२, दिनांक १९.८.२००२.

(२) शासन निर्णय, गृहविभाग,क्र.जीआरडी ०३९२/सिआर-११८/पोल-१०, दिनांक २७.७.९३.

(३) शासन निर्णय,गृहविभाग क्र. एसएस ०८८४/२१८५/विशा-४,दि.१४.११.८५

(४) शासन निर्णय,गृहविभाग क्र. जीआरडी ०३९२/सिआर १३९/पोल-१०, दि २१.७.९३.

(५) शासन निर्णय, गृहविभाग क्र. एसएसएम १०९३/४९१९/विशा-४, दि.४.६.९४,

(६) भारतीय विमानतळ प्राधिकरण यांचे पत्र क्र.ओओआय/एनओडी/९-३/२००० ओ-एसइसी/४५८,दिनांक १४.६.२००२.

(७) शासन निर्णय, गृहविभाग, क्र.पीओएस-०३९२/२९५८/प्र.क्र.५००/पोल-२ दिनांक १५.७.९३

शासननिर्णय:- राज्यातील औरंगाबाद,पुणे ,नागपूर येथील विमानतळ सुरक्षे करिता संदर्भाधिन क्र.२ ते ५ येथील शासन निर्णय अन्वये एकूण ८३ विविध संवर्गातील पोलीस अधिकारी व कर्मचारी यांची पदे निर्माण केलेली होती. प्रस्तुत विमानतळाची अंतर्गत सुरक्षा व्यवस्था केंद्रीय औधोगीक सुरक्षाबलामार्फत जूलै २००२ पासून राबवण्याचा निर्णय विमानतळ प्राधिकरणाने घेतला होता. यास्तव राज्य शासनाने उपरोक्त प्रयोजना करिता वेळोवेळी आदेशान्वये निर्माणकेलेली विविध संवर्गातील एकूण ८३ पदे पोलीस आयुक्त, औरंगाबाद, पूणे व नागपूर यांच्या आस्थापनेवर खालील नमूद पोलीस ठाण्यांमध्ये वर्ग करण्यास शासन या आदेशान्वये मान्यता देत आहे.

C:Gagurde

| पोलीस ठाणे | | पदांचा तपशिल | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | पो.नि. | पो.उप.नि. | स.पो.उप नि. | पो.हवा | पो.शि. | एकूण |
| अ | एमआयडीसी पोलीस ठाणे, औरंगाबाद. | - | ६ | | १ | ४ | ११ |
| ब | हिंजवडी पोलीस ठाणे,पूणे. | २ | १६ | ६ | ८ | १६ | ४८ |
| क | गिट्टीखदान पोलीस ठाणे, नागपूर | १ | १० | ३ | ४ | ६ | २४ |
| | एकूण | ३ | ३२ | ९ | १३ | २६ | ८३ |

(२) पूणे विमानतळ सुरक्षेतून कार्यमुक्त होणारी ४८ पदे वर्ग करुन हिंजवडी, पूणे येथे नविन पोलीस ठाणे निर्माण करण्यास शासन मान्यता देत आहे.

(३) प्रस्तूत ८३ पदांचे वेतन सन २००२-२००३ च्या मंजूर अनुदानातून भागवण्यात यावा व तो लेखाशिर्ष २०५५-पोल-१०९-जिल्हा पोलीस -(००)(०१) जिल्हा पोलीस बल (०१) वेतन खाली खर्ची टाकण्यात यावा.

(४) प्रस्तूत प्रकरणी पदांच्या विनियोगातील बदल लाक्षणिकपूरवणी मागणी बाब क्र.१९ अन्वये हिवाळी अधिवेशनात मंजूर करण्यात आली आहे.

(५) हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक सिआर-८४६/०२/व्यय-७ ,दि.८.१०.२००२ व प्र.क्र.१००१/अर्थ -३०, दि. २३.१०.२००२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सं. शं. इंगळे )

कार्यासन अधिकारी,गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

C:Gagurde

प्रति,

१. पोलीस महासंचालक व महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.

२. विशेष पोलीस महानिरीक्षक,नि व स. महाराष्ट्र राज्य,मुंबई.

३. विशेष पोलीस महानिरीक्षक,औरंगाबाद,पुणे ,नागपूर परिक्षेत्र.

४. पोलीस आयुक्त,औरंगाबाद ,पुणे,नागपूर

५. प्रधान महालेखापाल-१ (लेखा परीक्षा )मुंबई,

६. महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.

७. जिल्हा कोषागार अधिकारी,औरंगाबाद,पुणे,नागपूर.

८. वित्त विभाग ,व्यय-७/ अर्थ -१०,

९. गृह विभाग (सर्व पोलीस कार्यासने)

१०. निवडनस्ती.